**जिल्हा प्रशिक्षण केंद्राची स्थापना सन २०१६-१७ निधी वितरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निवियो-२०१६/प्र.क्र.१२४ /क्रीयुसे-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २५ जानेवारी, २०१७

**वाचा :** १) शासन निर्णय क्रमांक : युकधो-२०१२/प्र.क्र.४३/क्रीयुसे-३, दि. १४ जून, २०१२
२) शासन निर्णय क्रमांक क्रीडाधो/३११३/प्र.क्र.५५/क्रीयुसे-३, दि. २२ मे, २०१४
३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.९८/अर्थसं-३, दि. २० एप्रिल, २०१६
४) क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. शिक्रीपी/तरतूद/क्रीप्रके/निवि/२०१६/१७ का-१३/५९६ दि. २१ ऑक्टोबर, २०१६

**प्रस्तावना :**

राज्यात क्रीडा संस्कृतीचे संवर्धन, प्रचार, प्रसार व जोपासना करण्यासाठी पोषक वातावरण असणे आवश्यक आहे. जे जाणून क्रीडा धोरण जाहीर करणारे, महाराष्ट्र हे देशातील पहिले राज्य आहे. खेळाच्या पुरेशा सुविधा निर्माण करण्यासाठी राज्याने पुढाकार घेतलेला आहे. राज्य क्रीडा क्षेत्रात अग्रगण्य रहावे, नागरिकांमध्ये व्यायामाचे आवड जोपासावी, राज्यातील खेळाडूंनी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर दर्जेदार कामगिरी करण्यासाठी क्रीडा विषयक तंत्रशुध्द प्रशिक्षण, खेळाच्या दर्जात सुधारणा, खेळाडूंना गौरव, दर्जेदार क्रीडा सुविधा याबाबी केंद्र बिंदु माणून खेळाडूसाठी हितावह योजना राज्यात राबविण्यासाठी क्रीडा धोरण-२०१२ ला तयार करण्यात आला आहे. त्याची अंमलबजावणी करण्याबाबत दि. १४ जून, २०१२ चा शासन निर्णय निर्गमित झाला आहे. त्यातील शिफारसीच्या अनुषंगाने राज्यातील क्रीडा पटूंना वाव मिळण्यासाठी तसेच ग्रामिण व शहरी उद्योन्मुख खेळाडूंना अध्यावत कौशल्याचे प्रशिक्षण देण्यासाठी जिल्हयाच्या ठिकाणी जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्यात आले आहे. जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्रात मंजूर करण्यात येणाऱ्या अनुदानाची योजनेस दिनांक २२ मे, २०१४ अन्वये सन २०१५-१६ मध्ये रू. ५०६.९७ लक्ष इतका अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्या तरतूदी पैकी वित्त विभागाच्या दि. २०/०४/२०१६ च्या परिपत्रकानुसार रू. ३०४.१८ लक्ष इतक्या निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

ग्रामिण व शहरी उद्योन्मुख खेळाडूना अध्यावत कौशल्याचे प्रशिक्षण देण्यासाठी जिल्हयाच्या ठिकाणी जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्र स्थापन करून या केंद्राना नियमित आर्थिक सहाय्य उपलब्ध करून देण्यासाठी रू. ५०६.७९ लक्ष एवढा निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी रू. ३०४.१८ लक्ष तरतूद वितरीस करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा-१०४ क्रीडा व खेळ १०-क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना (१०)(०३) जिल्हा प्रशिक्षण केंद्राची स्थापना (२२०४-५६८२)" ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि. २०/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१. वित्त विभागाच्या दि. २०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

३.४. दि. २४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

३.५. परिपत्रकातील "अ" व "ब" ची पूर्तता होत आहे.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०१६ व दि. २४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबातची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अंटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७ व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२५१५२६५८३४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.01.25 15:24:00 +05'30'

( कि. ल. संखे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग (व्यय-५) मंत्रालय, मुंबई.
७. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, (संचालयामार्फत)
८. निवडनस्ती, क्रीयुसे-३.